राज्य योजना सन २०१८-१९
**निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) निधी वितरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.२१२/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ ऑगस्ट, २०१८.

वाचा :-
१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र क्र २१२/फ-१, दिनांक :- १९.०५.२०१८.
३. महसूल व वन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र क्र २१२/फ-१, दिनांक :- ३१.०५.२०१८.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र क्र २१२/फ-१, दिनांक :- ३१.०५.२०१८.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र क्र २१२/फ-१, दिनांक :- ३०.०६.२०१८.
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र क्र २१२/फ-१, दिनांक :- ३०.०७.२०१८
७. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र क्र २१२/फ-१, दिनांक :- ०४.०८.२०१८
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/इए/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३/७९७/१८-१९, दिनांक :- ०२.०८.२०१८.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/इए/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३/८४९/१८-१९, दिनांक :- १३.०८.२०१८.
१०. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/इए/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३/८५५/१८-१९, दिनांक :- १४.०८.२०१८.
११. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/इए/यो/चाबाप्र/प्र.क्र.७०/९१२/१८-१९, दिनांक :- २७.०८.२०१८.

प्रस्तावना :-

सन २०१८-१९ राज्यस्तरीय योजनेअंतर्गत निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये १२००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ क्रमांक २, ३, ४, ५, ६ व ७ च्या शासन निर्णयान्वये निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या योजनेअंतर्गत एकूण **रु.२२६.१४ लक्ष निधी** वितरित करण्यात आला आहे. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ८, ९, १० व ११ च्या पत्रान्वये सन २०१८-१९ करीता निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षांतर्गत **रु. २८४.२०८ लक्षचा** प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ८, ९, १०, व ११ च्या पत्रान्वये निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या योजनेंतर्गत सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे खालील अटींच्या अधीन राहून रु. २८४.२०८ लक्ष निधी खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१८-१९ मध्ये लेखाशिर्ष मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन ११०, वन्यजीवाचे संवर्धन (००) (०२) निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. कार्यबाबीमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

५. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक - १७.०४.२०१५ व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२९१७०८४०३२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.08.29 17:10:30 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई.
६. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, संह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.
७. मुख्य वनंसरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
८. मुख्य वनंसरक्षक (प्रादेशिक), पुणे.
९. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
१०. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
११. वनंसरक्षक (वन्यजीव), पुणे.
१२. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
१३. फ-१/२ ,ब कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*********

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०८.१८/प्र.क्र.२१२/फ-१, दिनांक :- २९ ऑगस्ट, २०१८ सोबतचे प्रपत्र.**

| अ.क्र. | विभागाचे नाव | एकूण रक्कम ( रु.लाखात) |
|---|---|---|
| १. | बोर व्याघ्र प्रकल्प | १२.७५९ |
| २. | पेंच व्याघ्र प्रकल्प | ४८.८८ |
| | | ३५.२२१ |
| ३ | मुख्य वनसंरक्षक तथा संह्याद्री व्याघ्र प्रकल्प | २९.९० |
| ४ | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पूणे | १५.१६ |
| ५ | वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे. | ३५.०० |
| ६ | मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प | ७८.१२६ |
| | | २८.९८४ |
| | **एकुण** | **२८४.२०८** |

********